“हिंदुह्रदयसम्राट बाळासाहेब ठाकरे आपला दवाखाना” या योजनेकरिता सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून २२१०K०४१ या लेखाशिर्षातून रु. २९.४० कोटी इतके अनुदान वितरीत करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

### सार्वजनिक आरोग्य विभाग

### शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-१०२५/प्र.क्र.२२२/आरोग्य-७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २४ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४ व दि. १७.०३.२०२५

२) शासन निर्णय प्रशामा-१२२३/प्र.क्र.१८०/आरोग्य-७, दिनांक ११ जुलै, २०२३

३) सहसंचालक, (तांत्रिक) राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र.राआसो/एचबिटी आपला दवाखाना/औषध खरेदी/६९७६९-७६६/२४, दिनांक निरंक चे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्यातील जनतेला प्राथमिक आरोग्य केंद्र, नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र, उपकेंद्र, ग्रामीण रुग्णालय, स्त्री रुग्णालय, उपजिल्हा रुग्णालय, जिल्हा रुग्णालय, वैद्यकीय महाविद्यालय रुग्णालय व महानगरपालिका रुग्णालय यांच्यामार्फत आरोग्य सेवा उपलब्ध करुन दिली जाते. शहरी भागातील अतिशय दाटीवाटीने वसलेल्या भागापासून तसेच झोपडपट्टी वस्तीपासून नागरी प्राथमिक आरोग्य केंद्रांचे अंतर जास्त असणे, नागरी प्राथमिक आरोग्य केंद्राच्या कामकाजाच्या अयोग्य वेळेमुळे काही झोपडपट्ट्या व झोपडपट्टीसदृश भाग आरोग्य सेवापासून वंचित राहत आहे. तसेच राज्यातील दवाखाने अत्याधुनिक तंत्रज्ञानाने अद्ययावत बनविण्यासाठी, सातत्यपूर्ण आरोग्य, गुणवत्तापूर्ण सेवा तसेच सुलभ आणि परवडणारी जागतिक दर्जाची आरोग्य सेवा प्रदान करुन राज्याचा आरोग्य निर्देशांक वाढविण्याचे शासनाचे धोरण आहे. शहरी भागातील झोपडपट्ट्या व झोपडपट्टीसदृश भागामध्ये आरोग्य केंद्रे उपलब्ध नाहीत. त्यामुळे सदर भागातील सर्वसामान्य जनता आरोग्य सेवेपासून वंचित राहत आहे. देशातील बऱ्याच राज्यांमध्ये दर्जेदार आरोग्य सेवा देण्यासाठी व आरोग्य निर्देशांक वाढविण्यासाठी शहरी भागातील अतिशय दाटीवाटीने वसलेल्या भागात व झोपडपट्टी क्षेत्रात दवाखाने स्थापन करुन आरोग्य सेवा देण्याचे प्रयोग सुरु करण्यात आलेले आहेत. राज्यातील विविध शहरांतील झोपडपट्टीमध्ये राहणाऱ्या सर्वसामान्य व गोरगरीब नागरिकांना मोफत आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी राज्यात ७०० ठिकाणी “हिंदुह्रदयसम्राट बाळासाहेब ठाकरे आपला

दवाखाना" स्थापन करण्यासाठी संदर्भ क्र.(२) अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता २२१०K०४१ (३१, सहायक अनुदाने वेतनेत्तर ) या लेखाशिर्षाखाली "हिंदुहृदयसम्राट बाळासाहेब ठाकरे आपला दवाखाना" या योजनेसाठी सन २०२४-२५ मध्ये २२१०K०४१ (३१, सहायक अनुदाने वेतनेत्तर ) या लेखाशिर्षा खाली महाराष्ट्र वैद्यकिय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई मार्फत औषधी खरेदी करण्यासाठी रू. २९.४० कोटी इतके अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करून देण्याची बाब बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :-

"हिंदुहृदयसम्राट बाळासाहेब ठाकरे आपला दवाखाना" या योजनेकरिता सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून २२१०K०४१ ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली महाराष्ट्र वैद्यकिय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई मार्फत औषधी खरेदी करण्यासाठी रू. २९.४० कोटी इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी वितरणाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

**(रु. कोटीत)**

| | | **लेखाशिर्ष** | **सन २०२४-२५ सुधारित तरतूद** | **वितरीत करावयाची रक्कम** |
|---|---|---|---|---|
| | मागणी क्रं.आर-१,<br>(४) (५) हिंदुहृदयसम्राट बाळासाहेब ठाकरे आपला दवाखाना (कार्यक्रम)<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | २२१०K०४१ | १९६.७९ | २९.४० |

२. सदरचा खर्च वर तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे संबंधित लेखाशीर्षाखालील सन २०२४-२५ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा.

३. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय , मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयके कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत "हिंदुहृदयसम्राट बाळासाहेब ठाकरे आपला दवाखाना" करीता नव्याने उघडण्यात आलेल्या आभासी वैयक्तिक ठेव लेखा खाते (Virtual Personal Deposit Account) मध्ये सुपुर्द करावी.

४. वित्त विभागाच्या दिनांक २५.०७.२०२४ च्या शासन परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.८ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधी त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक

२५.०७.२०२४ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक २५.०७.२०२४ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/ विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

६. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे राज्य आरोग्य सोसायटीने प्रमाणित केलेले आहे.

७. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

८. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २५.०७.२०२४ च्या शासन परिपत्रकातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहेत.

९. सदर अनुदान सशर्त असून यापुर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

१०. शासनाच्या धोरणानूसार सदर प्रस्तावातील निधी "हिंदुह्रदयसम्राट बाळासाहेब ठाकरे आपला दवाखाना" करीता नव्याने उघडण्यात आलेल्या आभासी वैयक्तिक ठेव लेखा खाते (Virtual Personal Deposit Account) मध्ये जमा करून राज्य आरोग्य सोसायटी अंतर्गत खर्च करण्यात यावी. वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व दिनांक १४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे/अटी व शर्तीचे पालन त्यासदंर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधकारक राहील.

११. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१२. सदरचा शासननिर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९४/२०२५/का.१४७२, दि.०३.०३.२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ २१३/२०२५/व्यय-१३ दि, २१.०३.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२४११३३१२४६१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2025.03.24 17:51:47 +05'30'

( राजेंद्र वि.कुडले )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
६. सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
११.निवडनस्ती (आरोग्य-७) .